छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था सारथी पुणे या संस्थेच्या अधिनस्त नाशिक विभागीय कार्यालय येथील अभ्यासिका, मुलांचे व मुलींचे वसतिगृह इत्यादी इमारतीसाठी संरक्षक भिंत व प्रवेशद्वाराचे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र: सारथी २०२३/प्र.क्र.४०/का.१४२५**
**हुतात्मा राजगुरू चौक मादाम कामा रोड मंत्रालय, मुंबई -०३२**
**दिनांक - २९ मार्च, २०२३.**

**वाचा:**

१. शासन निर्णय , महसूल व वन विभाग क्र.जमीन ३०२१/प्र.क्र.१४०/ज.६ दि.२९/६/२०२२
२. शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग -२)दि.२०/९/२०१९
३. व्यवस्थापकीय संचालक छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांचे पत्र क्रं.सारथी/स्थावर विभाग/फा.क्र १०/३०७०/२०२२-२३ दि.२५/०१/२०२३ चे पत्र व सहपत्र
४. नियोजन विभाग सम क्रमांक दिनांक ८.०२.२०२३
५. व्यवस्थापकीय संचालक छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांचे पत्र क्रं.सारथी/स्थावर विभाग/फा.क्र १०/३१८८/२०२२-२३ दि.२१/०२/२०२३ चे पत्र व सहपत्र

**प्रस्तावना:-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांच्या अधिनस्त नाशिक विभागीय कार्यालयास शासन संदर्भातील क्रं.१ च्या निर्णयान्वये मुले-मुलींना वसतीगृह व इतर अनुषंगिक बाबींसाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील कलम ४० व महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम १९७१ मध्ये नियम ५ मधील तरतुदी नुसार महसुल मुक्त व भोग वाटा मुल्य रहित किंमतीने मौजे नाशिक, ता.व जि.नाशिक येथील गट १०५६, १०५७/१ मधील ०.६० हे.आर. (६००० चौ.मि.) शासकीय जमिन नियोजन विभागास प्रदान करण्यात आली सदर प्रकल्पाच्या बांधकामाचे व संचालनाचे काम सारथी संस्थेमार्फत करण्याबाबत नियोजन विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार सारथी कंपनीने उपरोक्त जमिनीचा प्रत्यक्ष ताबा दिनांक २५.०८.२०२२ रोजी घेतलेला आहे.

छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांच्या अधिनस्त नाशिक विभागीय कार्यालयाच्या कामासाठी संदर्भाधीन क्रं.३ च्या पत्रान्वये रु.१३१.३३ लक्ष एवढया रकमेचा नाशिक विभागीय कार्यालयाचे अभ्यासिका, मुलांचे व मुलींचे वसतीगृह इ.प्रस्तावित इमारतीसाठी दगडी संरक्षक भिंत व प्रवेशद्वाराचे बांधकामाचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. तथापि दिनांक ४.१.२०२३ रोजी झालेल्या संचालक मंडळाच्या बैठकीमध्ये व दिनांक १९.१.२०२३ रोजी झालेल्या कार्यकारी समितीच्या बैठकीमध्ये कार्यकारी अभियंता व मुख्य अभियंता सा.बां.विभाग, नाशिक यांनी अंदाजपत्रक दगडी बांधकामामध्ये दोन्ही बाजुला CRS Masonry ०.६० m मध्ये बांधकाम करण्याचे प्रस्तावित करण्याचे निर्देश दिले. दगडी भिंतीच्या बांधकामाचे जाडी वाढल्यामुळे एकूण अंदाजपत्रिकेमध्ये ६३.६३ लक्ष ची वाढ झाली आहे. त्यामुळे या पूर्वी सादर करण्यात आलेल्या १३१.३३ लक्ष चा प्रस्ताव रद्द करुन रुपये १९४.९६ लक्ष ऐवढ्या खर्चाचे अंदाजपत्रकास

प्रशासकीय मान्यता देण्याबाबत छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांनी मा.अध्यक्ष सारथी यांच्या निर्देशानुसार पाठविण्यात आला आहे.

**शासन निर्णय** :-

छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे यांच्या अधिनस्त नाशिक विभागीय कार्यालयासाठी मुला-मुलींच्या वसतीगृहाच्या इमारतीसाठी दगडी संरक्षक भिंत व प्रवेशद्वाराचे बांधकाम अनुषंगिक बाबींसाठी रु.१,९४,९६,५११.००/- इतक्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | | तपशील | युनिट रेट/Per Sq.M | रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १. | अ | अत्यावश्यक बाबी (बांधकाम) | | |
| | | इमारती | | |
| | | उपअंदाजपत्रक क्रमांक १ - प्रवेशद्वार | | रु.४८,८९,७२०.००/- |
| | | उपअंदाजपत्रक क्र.२ - सरंक्षक भिंत | | रु.९०,४७,८५७.००/- |
| | | एकुण इमारतीच्या बांधकामाचे अंदाज | ० Sq.m | रु.१,३९,३७,५७७.००/- |
| २. | इ | तरतूद | | |
| | १. | विद्युत आकारणी | २.५ % | रु.३,४८,४३९.४३/- |
| | २. | आकस्मिकता निधी | ४ % | रु.५,५७,५०३.०८/- |
| | ३. | जि.एस.टी. | १८% | रु.२५,०८,७६३.८६/- |
| | ४. | संगणक | २ % | रु.२,७८,७५१.५४/- |
| | ५. | कामगार विमा | १ % | रु.१,३९,३७५.७७/- |
| | ६. | लॅब टेस्टिंग | | रु. ४०,४१५.००/- |
| | ७. | रॉयल्टी चार्चेस | | रु.२,९१,९२७.२८/- |
| | ८. | अपेक्षित भाववाढ | १० % | रु.१३,९३,७५८.००/- |
| | | **एकुण** | | **रु.१,९४,९६,५१०.९६/-** |
| | | **प्रस्तावाची एकंदरीत किंमत** | | **रु.१,९४,९६,५११.००/-** |

२. प्रस्तुत प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रं.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च नियोजन विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियत व्ययामधून करण्यात यावा.

५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

६) प्रस्तावातील खरेदी संबंधी बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग ऊर्जा व कामगार विभागाकडे दि.२४/८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये सूचना विचारात घ्याव्या.
७) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूची बाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्र.२०१७/ प्र.क्र.११/नियोजन-३ दिनांक ११/४/२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
८) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेणे.
९) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबीं करिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग ऊर्जा विभागाकडील दिनांक २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.
१०) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय कामाची आवश्यकता लागणार या दृष्टीने विशेष दक्षता घेवून काम करण्यात यावे.
११) काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. तसेच जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही या बाबतची खातरजमा व्यवस्थापकीय संचालक, सारथी यांनी करावी.
१२) ढोबळ स्वरुपात करण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके व दरपत्रके करुन काम हाती घ्यावे.
१३) प्रस्तुत काम अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास ५ % सेंटेंज चार्जेस मिळविण्यात यावे.

३. उपरोक्त कामासाठी होणारा खर्च हा नियोजन विभाग मागणी क्रं.ओ-२,लेखाशीर्ष २२२५ अनुसूचित जाती-अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ०१ “मराठा, कुणबी,कुणबी-मराठा व मराठा-कुणबी यांचे कल्याण (०१)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ-५२१) ३५- भांडवली मत्याची निर्मितीकरिता अनुदान या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग -पाच, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४(२) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने तसेच नियोजन विभाग यांचे परिपत्रक क्र.ससमा २०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दिनांक ११.०६.२०१८ च्या तरतुदीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रं. २०२३०३२९१५१९४४५४१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIDHYADHAR MAHADEV BORKAR
Date: 2023.03.30 12:28:54 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई
३) मा.मंत्री,उच्च् व तंत्र शिक्षण,मंत्रालय,मुंबई
४) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
५) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग ,मंत्रालय मुंबई
६) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
८) व्यवव्स्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) पुणे
९) मुख्य अभियंता सा.बा.प्रादेशिक विभाग,नाशिक
१०) अधिक्षक अभियंता,सा.बा.मंडळ, नाशिक
११) कार्यकारी अभियंता,सा.बा.विभाग, नाशिक
१२) उपसंचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, पुणे/नाशिक
१३) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग नाशिक
१४) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
१५) निवासी लेखा परिक्षा मुंबई
१६) कक्ष अधिकारी (का.क्रं इमारती-१) सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय मुंबई-१
१७) निवडनस्ती. (का.१४२५)